पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग (खुद्द) वेबसाईट सिक्युरीटी ऑडिट व GIGW पूर्तता अंदाजपत्रकास मान्यता देण्याबाबत-

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१४/७८५/प्र.क्र.२११/आस्थापना**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २१ एप्रिल, २०२३.

संदर्भ : १. शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन ( माहिती तंत्रज्ञान) विभाग, क्र.मातंसं-२०१८/प्र.क्र.१०२/ से- ४/३९, दि.१८.०९.२०१८
२. शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र.संकीर्ण २०१४/७८५/प्र.क्र.२११/ आस्थापना, दि. १४ जानेवारी, २०२०.
३. शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र.संकीर्ण-२०१४/७८५/प्र.क्र.२११/ आस्थापना, दि. २७ मार्च, २०२०, शासन शुध्दीपत्रक समक्रमांक दि.२७ मार्च , २०२०, शासन निर्णय दि.११ नोव्हेंबर २०२०, दि.२४ मार्च २०२१ व दि.३ ऑगस्ट २०२१.
४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ, मुंबई यांचे पत्र क्र. एमएच आयटी/ओडब्ल्यु /०४२३, दि. १८ एप्रिल, २०२३ व देयक क्रमांक TI/FY२३२४/०००५० दि. २० एप्रिल २०२३

**प्रस्तावना** :-

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र.१ येथील परिपत्रकान्वये विहीत केलेल्या दिशानिर्देशांनुसार पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागाची अस्तित्वात असलेली वेबसाईट (https://cultural.maharashtra.gov.in) अद्ययावत करण्यासाठी महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळाकडुन प्राप्त झालेल्या अंदाजपत्रकानुसार संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये सदर कामाच्या रू.११,१९,८१३.८१ (रूपये अकरा लक्ष एकोणीस हजार आठशे तेरा पैसे एक्याऐंशी फक्त ) इतक्या अंदाजित खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयांन्वये, संबंधित आर्थिक वर्षातील निधीच्या उपलब्धतेनुसार वेळोवेळी सदर कामास वित्तिय मान्यता देण्यात आली आहे. सदर संकेतस्थळाचे (Testing URL: http:// testcultural.mahaitgov.in/ Production URL: https: https://cultural.maharashtra.gov.in/) चे सिक्युरीटी ऑडिट प्रमाणपत्र ३ जून २०२१ रोजी देण्यात आले आहे. संकेतस्थळाचे सिक्युरीटी ऑडिट प्रमाणपत्र प्रत्येक वर्षी घेणे आवश्यक आहे. याअनुषंगाने, व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ लि. यांनी संदर्भ क्र. ४ येथील पत्रान्वये सिक्युरीटी ऑडिट व GIGW पूर्तता करण्याबाबतचे रू.३,०५,०३०/- (रूपये तीन लक्ष पाच हजार तीस फक्त ) इतक्या अंदाजित खर्चाचे अंदाजपत्रक मान्यतेसाठी सादर केले आहे. सदर अंदाजपत्रकास प्रशासकीय व वित्तिय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

Testing URL: http:// testcultural.mahaitgov.in/ Production URL: https: https://cultural.maharashtra.gov.in/) चे सिक्युरीटी ऑडिट व GIGW पूर्तता करण्यासाठी रू.३,०५,०३०/- (रूपये तीन लक्ष पाच हजार तीस फक्त ) इतक्या अंदाजित खर्चाच्या अंदाजपत्रकास सदर शासन निर्णयान्वये प्रशासकीय व वित्तिय मान्यता देण्यात येत आहे.

| पुरवठाधारकाचे नाव | देयक क्रमांक व दिनांक | देयकाची मूळ रक्कम | १८ % GST | देयकाची एकुण रक्कम (१८ %GST सह) | २ % आयकर | ४% शैक्षणिक कर | देय रक्कम |
|---|---|---|---|---|---|---|---|
| महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ लि. | TI/FY२३२४/०००५० दि. २० एप्रिल २०२३ | रू. २,५८,५००/- | रू. ४६,५३०/- | रू. ३,०५,०३०/- | रू. ६१००.६ (पूर्णांकात ६१०१/-) | रू. २४४.०२ (पूर्णांकात रू. २४४/-) | रू. २९८६८५.३८ (पूर्णांकात रू. २,९८,६८५/-) |
| | **एकूण** | रू. २,५८,५००/- | रू. ४६,५३०/- | रू. ३,०५,०३०/- | रू. ६१०१/- | रू. २४४/- | रू. २,९८,६८५/- |

**२.** यावर उपरोक्तपणे होणारा एकूण खर्च लेखाशीर्ष २२५१ ०८९३, ई-गव्हर्नन्स प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी तरतूद (कार्यक्रम) या खाली सन २०२३-२४ या वित्तीय वर्षात मंजूर करण्यात आलेल्या तरतुदीमधून भागविण्यात यावा. सदर रक्कम आहरीत करुन अदा करण्यासाठी अवर सचिव (रोखशाखा), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून व उपसचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदरहू ज्ञापनाव्दारे मान्यता देण्यात आलेल्या एकूण रू.३,०५,०३०/- ( रूपये तीन लक्ष पाच हजार तीस फक्त ) रकमेपैकी २% आयकर रू.६१०१/- ( रूपये सहा हजार एकशे एक फक्त ) व ४% शैक्षणिक भार रू.२४४ /-
( रूपये दोनशे चव्वेचाळीस फक्त ) वजाती करून उर्वरित रू.२,९८,६८५/- (रूपये दोन लक्ष अठ्ठयाण्णव हजार सहाशे पंच्याऐंशी फक्त ) इतक्या रक्कमेमधून मूळ देयकावरील रकमेवर २ % जी.एस.टी.म्हणजेच रू.५,१७० /- ( रूपये पाच हजार एकशे सत्तर फक्त ) एवढया रकमेचा GST भरणा करण्याकरीता तसेच उर्वरित महाआयटी यांना देय असलेली रक्कम रू.२,९३,५१५/- ( रूपये दोन लक्ष त्र्याण्णव हजार पाचशे पंधरा फक्त ) चा ई.सी.एस., आहरण व संवितरण अधिकारी यांच्या नावे देण्यात यावा.

**३.** शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.सीओएम १००१/ प्र.क्र. १७४ /०१/३९, दि. २९ ऑक्टोबर २००१ व शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मातंस-२०११/ प्र.क्र.१२५/३९, दि.२३ सप्टेंबर २०११ या आदेशांच्या अधीन राहून तसेच शासन निर्णय क्रमांक भाखंस २०१४/ प्र.क्र.८२-भाग ।।। / उद्योग ४ दि. १ डिसेंबर २०१६ नुसार सदर अनुदानाचा विनियोग केल्यानंतर महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळाकडून सदर रक्कम त्याच प्रयोजनार्थ वापरण्यात आली असल्याबाबत उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात येईल.

**४.** शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तिय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ (भाग पहिला) उप विभाग- दोन अन्वये अनुक्रमांक २७ § अ नियम क्र.७६ मधील अटींचे पालन करण्याच्या अधीन ई-गव्हर्नन्स यंत्रणेबाबत प्रशासकीय विभागास रू.२०.०० लक्ष पर्यंत खर्च करण्याचे वित्तिय अधिकार प्रदान करण्यात आले आहेत. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. संकीर्ण २०१८/ प्र.क्र.१४४/२०१८/कोषा/प्रशा-५, दि.२८ सप्टेंबर २०१८ अन्वये प्रशासनिक विभागास प्राप्त झालेल्या अधिकारानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०४२११३४७०५३०२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

SUMANT DINKAR PASHTE

Digitally signed by SUMANT DINKAR PASHTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=58694d4cd2bd16f0ab6514fc8598a9aa217e2508455856a701adb1bb6ef9b120, pseudonym=565ADED7321B71A5B0327BA1F7149AED1F618E4E, serialNumber=AFC006DAAE95D0F2CF7C7F09CA18CF0C9C9363A05E6070B1C03455CF1CB43586, cn=SUMANT DINKAR PASHTE
Date: 2023.04.21 16:48:40 +05'30'

**( सु. दि. पाष्टे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. प्रधान सचिव (सांस्कृतिक कार्य) यांचे स्वीय सहायक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२
२. प्रधान सचिव यांचे स्वीय सहायक, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२
३. अधिदान व लेखा अधिकारी (रोखशाखेमार्फत)
४. महालेखापाल -१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
५. निवासी लेखा अधिकारी, मुंबई
६. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ, मुंबई.
७. वित्त विभाग (कार्यासन - व्यय/ विनियम), मंत्रालय, मुंबई.३२
८. उप सचिव (आस्थापना / अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. उप सचिव / अवर सचिव (रोखशाखा), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. अवर सचिव / कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. निवड नस्ती.